राज्य योजना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सावनि-२०२२/प्र.क्र. १७ (भाग-१)/फ-११**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**दिनांक :- २५.०२.२०२२.**

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ६.०४.२०२१.
२. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक : सावनि-२०२१/प्र.क्र.१७/फ-११, दि. ७.०५.२०२१.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४.०६.२०२१.
४. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक : सावनि-२०२१/प्र.क्र.१७/फ-११, दि. ०५.०७.२०२१.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१.
६. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक : सावनि-२०२१/प्र.क्र.१७/फ-११, दि. २०.१०.२०२१.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०३.०२.२०२२.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२२/२०२१-२२/५७६, दि. १५.०२.२०२२.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३१/२०२१-२२/५८८, दि. १७.०२.२०२२.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२९/२०२१-२२/५९२, दिनांक १७.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरिता सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. १०३८००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१, ३, ५ व ७ चे शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना जारी करण्यात आल्या आहेत.

संदर्भ क्रमांक ८, ९ व १० च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत रू. ३६३८९.३७ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला असून त्या अनुषंगाने शासनाकडुन पुढील निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ७ चा शासन निर्णय विचारात घेता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर संदर्भ क्रमांक ८, ९ व १० च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या लेखाशिर्षांतर्गत खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विविध उद्दीष्टान्वये **रु. १८७३६.८४ लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

**(रु. लाखात)**

| उद्दिष्ट शिर्ष | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|
| ०२-मजुरी | १६६८८.४१ |
| २१-पुरवठा व सामग्री | २०४८.४३ |
| **एकूण** | **१८७३६.८४** |

२. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०२१-२२ मध्ये मुख्य लेखाशिर्ष ४४०६ वनीकरण व वन्यजीवन, यावरील भांडवली खर्च, ०१ वनीकरण, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निमिती, (००) (०६) ०२, पर्यावरणीय वनिकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण, (००) (०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (कार्याक्रम) ( ४४०६ ०४९२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

५. सदर निधी वितरित करण्यापूर्वी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांनी सदर योजनेसाठी, सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी. या अटीच्या अधीन निधी वितरणाची कार्यवाही करण्यात यावी.

६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भाधिन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

७. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२).**
**०२- मजूरी, २१ साहित्य व पुरवठा**

९. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२ चे काटेकोर पालन करावे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२५१५०९५७४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080,
postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc5655271c,
cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.02.25 15:14:15 +05'30'

**(डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) , महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. मुख्य वनसंरक्षक /वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )

५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )

६. उप वनसंरक्षक ( प्रादेशिक) ( सर्व) /विभागीय वन अधिकारी (प्रा.) / उप विभागीय वन अधिकारी (प्रा.)

७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )

८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र व व , , मुंबई व नागपूर,

९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.

११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई

१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२

१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

*******